सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीत तरतूदीचे वितरण करणेबाबत.
राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंर्तगत (STCCS) प्राथमिक कृषि पतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य (२४२५२५१५)

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.अर्थसं ०६२१/ प्र.क्र.६९/१८-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२२

वाचा :-

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक सीसीआर ०३१३/ प्र.क्र.१४४/२-स, दिनांक ०६/०९/२०१४ व दिनांक ०२/०८/२०१७
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दिनांक १०/०५/२०१६
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४/१०/२०२१
४. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण ०९१९/ प्र.क्र.१०६/१८-स, दिनांक १६/११/२०२१
५. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं ०६२१/ प्र.क्र.६९/१८-स, दिनांक १०/१२/२०२१
६. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन शुध्दीपत्र क्रमांक अर्थसं ०६२१/ प्र.क्र.६९/१८-स, दिनांक २१/१२/२०२१
७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २८/०१/२०२२
८. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र. ३-सआ/२/वि.का.सक्षमीकरण/उप. प्रमाणपत्रे/२०२२, दिनांक ०७/०३/२०२२

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ अन्वये राज्य शासनाने राज्यातील शेतकऱ्यांना पीककर्ज पुरवठा होण्यासाठी प्राथमिक कृषि पतपुरवठा संस्थांचे सक्षमीकरण करण्यासाठी शासनामार्फत पीक कर्ज पुरवठ्याच्या प्रमाणात अर्थसहाय्य करण्याचा निर्णय घेतलेला आहे. या संस्थांनी प्रत्येक आर्थिक वर्षात केलेल्या कर्ज वाटपाच्या प्रमाणात ०.७५ ते २% अर्थसहाय्य देण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. अर्थसहाय्य देण्यात येणाऱ्या प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांनी शासन निर्णयात नमूद केलेल्या अटी/निकषांची पूर्तता करणे बंधनकारक आहे.

राज्य शासनाच्या धोरणास अनुसरून, सन २०२१-२२ या चालू आर्थिक वर्षासाठी राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरण करण्यासाठी अर्थसहाय्य (लेखाशिर्ष २४२५२५१५) या योजनेअंतर्गत निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरण करण्यासाठी अर्थसहाय्य (लेखाशिर्ष २४२५२५१५) या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ वर्षात अर्थसंकल्पीत रू.४०००.०० लाख तरतूदीपैकी वित्त विभागाच्या वाचा क्रमांक ७ येथील शासन परिपत्रकानुसार ६०% म्हणजेच रू.२४००.०० लाख निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. वाचा क्रमांक-५ व ६ येथील शासन निर्णय व शासन शुध्दीपत्रान्वये रू.२०००.०० लाख एवढ्या निधीचे नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने वितरण करण्यास यापूर्वी मान्यता देण्यात आलेली आहे. आता उर्वरित रू.४००.०० लाख (रूपये चार कोटी फक्त) {रू.२४००.०० लाख - रू.२०००.०० लाख} इतक्या निधीचे वितरण करून खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २८/०१/२०२२ अन्वये अर्थसंकल्पीत तरतूदीच्या ६०% निधी नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने वितरीत करण्याच्या सूचना असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका / संस्थांस वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्यालयाने वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र. ७ येथील शासन परिपत्रकामधील सूचनांचे पालन करावे.

५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दिनांक १०/०५/२०१६ अन्वयेच्या परिच्छेद "अ" नुसार या प्रकरणीची माहिती खालीलप्रमाणे आहे :-

*(१)* **विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- वित्त विभागाने विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार सादर करण्यात येत आहे.

*(२)* **मंजूर निधी** :- या योजनेच्या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी रूपये ४०००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत झालेला आहे.

*(३)* मागील ३ महिन्यापूर्वी रू.२०००.०० लाख एवढ्या निधीचे वाटप करण्यात आले आहे. यास्तव दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे.

(४) ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापासूनचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. :- या योजनेखाली देयकांची संक्षिप्त देयके पारीत होत नाहीत.

(५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे :- लागू नाही.

(६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- या योजनेअंतर्गत वैयक्तिक लाभार्थी नाहीत. प्राथमिक कृषी पतपुरवठा संस्था ह्या लाभार्थी आहेत.

(७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात करावा. :- लागू नाही.

(८) खरेदीविषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.

(९) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी :- लागू नाही.

६. सदर तरतूद संबंधित संस्थांना अदा करण्यासाठी V0004-सहायक निबंधक (अर्थसंकल्प आणि नियोजन), आयुक्त, सहकार, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच जिल्हा उपनिबंधक कार्यालयातील सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करून हा खर्च किती वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व विकास मंडळनिहाय खर्चाची माहिती वेळो वेळी शासनास पाठवावी.

७. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - (१९५), सहकारी पत संस्थांना सहाय्य (०१) व्याजात सवलत (०१) (०२) राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य (लेखाशिर्ष २४२५२५१५)-३३ अर्थसहाय्य ", या लेखाशिर्षाखालील सन २०२१-२२ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून सदर रक्कम खर्च करण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्र.१६२/१४३१, दिनांक ३०/०३/२०२२ तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्र.२४६ /२०२२/व्यय-२, दि.३१/०३/२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदरचा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०३३१२३३७४२५७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shrikrushna Anandrao Wadekar

Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e, pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6DBD5, serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2022.03.31 23:39:31 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**

**विशेष कार्य अधिकारी तथा सहनिबंधक**

प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-

१. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
५. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
६. समन्वयक, राज्य स्तरीय बँकर्स समिती, पुणे.
७. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि., मुंबई.
८. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
९. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
१०. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प -१३, मंत्रालय, मुंबई
११. अवर सचिव (कार्या १७ स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. कोषागार अधिकारी, पुणे.
१३. निवड नस्ती-१८-स.